**शेतीच्या अवजारांवरील करमाफीकरिता १०,०००/- रुपये पर्यन्त किंमतीची मर्यादा वाढविल्यामुळे दिनांक १.६.२००४ ते १.१२.२००४ या कालावधीकरिता द्यावयाची प्रशासकीय सवलत.**

---

**महाराष्ट्र शासन,**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय क्रमांक-विकअ-१२.०४/प्रक्र.६९/कराधान-१,**
**मंत्रालय,मुंबई-४०००३२, दिनांक: 22 फेब्रुवारी २००५.**

**प्रस्तावना:-**

मुंबई विक्रीकर अधिनियम १९५९ च्या कलम ५ संबंधित अनुसूची क मधील नोंद १ च्या उपनोंद (१) मधील तक्त्यातील स्तंभ क्र.३ नुसार रु.३०००/- पर्यन्तच्या किंमतीच्या शेतीच्या औजारांवर विक्रीकर माफी होती. ही मर्यादा घालून बरीच वर्ष झाली. शेतीचा वाढलेला उत्पादन खर्च आणि भाववाढ लक्षात घेवून माननीय वित्तमंत्री यांनी दिनांक २७.५.२०००४ रोजी सादर केलेल्या सन २००४-०५ वर्षाच्या अर्थसंकल्पीय भाषणात सदर शेतीच्या औजारांवरील करमाफीची मर्यादा रु.३०००/- वरुन रु.१०,०००/- करण्याचे प्रस्तावित केले होते.

त्या अनुषंगाने शासन अधिसूचना क्रमांक-विकअ-१२.०४/प्रक्र.६९-अ/ कराधान-१, दिनांक २.१२.२००४ रोजी प्रसिध्द करण्यात आली असून सदर अधिसूचनेनुसार रुपये १००००/- पर्यन्तच्या शेतीच्या औजारावरील विक्रीकराची माफी दिनांक २.१२.२००४ पासून अंमलात आली. सदर करमाफी जाहीर केल्यानंतर त्याबाबतची अधिसूचना प्रत्यचात प्रसिध्द करण्यास काही कालावधी लागला. त्यामुळे १.६.२००४ ते दिनांक १.१२.२००४ या कालावधीत केलेल्या शेतीच्या औजाराच्या खरेदी/विक्रीबाबत सदर अधिसूचनेचा फायदा व्यापा-यांना देता आला नाही. ही बाब विचारात घेऊन दिनांक १.६.२००४ ते दिनांक १.१२.२००४ या कालावधीसाठी प्रशासकीय सवलत मंजूर करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यानुसार विचारांती शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय**

१. मुंविका अधिनियम १९५९ च्या कलम ५ च्या उपकलम (२) अन्वये शासन अधिसूचना क्रमांक-विकअ-१२.०४/प्रक्र.६९-अ/कराधान-१, निर्गमित करुन सदर अधिसूचनेद्वारे शेतीच्या औजारांवरील करमाफीची मर्यादा रु.३०००/- वरुन रु.१००००/- पर्यन्त वाढविण्यात आली

असून त्यामुळे या औजारांच्या रूपये १०,०००/- पर्यन्तच्या खरेदी/विक्री व्यवहारावरील विक्रीकर माफ होत आहे. सदर अधिसूचना दिनांक २.१२.२००४ पासून अंमलात आली असल्यामुळे दिनांक १.६.२००४ ते दिनांक १.१२.२००४ पर्यन्तच्या कालावधीसाठी केलेल्या शेतीच्या औजाराच्या खरेदी /विक्री व्यवहारावर पुढील शर्तीच्या अधीन राहून शासन प्रशासकीय सवलत मंजूर करीत आहे.

अ) दिनांक १.६.२००४ ते २.१२.२००४ पर्यन्तच्या कालावधीसाठी वसूल केलेला व भरलेल्या विक्रीकराचा परतावा मिळणार नाही.

ब) प्रशासकीय सवलत मंजूर करण्याचे अधिकार विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना देण्यांत येत असून आवश्यकतेनुसार सदर अधिकार आयुक्तांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील अपर विक्रीकर आयुक्त, उपआयुक्त(प्रशासन), सहाय्यक विक्रीकर आयुक्त(प्रशासन) अथवा त्या दर्जाखालील इतर संबंधित अधिका-यांना प्रदान करण्यांची परवानगी विक्रीकर आयुक्तांना देण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( एस.एन.जामोदे )
शासनाचे उप सचिव

प्रत:-

माहितीसाठी व आवश्यक त्या पुढील कार्यवाहीसाठी सादर अग्रेषित.

१) महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.
२) महालेखापाल (लेखा परीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.
३) संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र, मुंबई.
४) विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, विक्रीकर भवन, ८ वा मजला, माझगांव, मुंबई-४०००१०.(२० प्रती).
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६) निवासी लेखा परीक्षक, मुंबई.
७) महासंचालक, माहिती व जनसंपर्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८) निवड नस्ती, कराधान-१.